बायोमॅट्रीक प्रणालीव्दारे कार्यालयीन
उपस्थिती नोंदविण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक - संकीर्ण ३६१९/प्र.क्र.७९/१८ (र.व का.)**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : ०४ नोव्हेंबर, २०१९

**वाचा :** १) शासन परिपत्रक क्रमांक : समय १००६/प्र.क्र.३३/२००६/१८ (र. व का.) दि.३०.६.२००६
२) शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण -२०१४/प्र.क्र.८०/१८ (र.व का.) दि.३१.१२.२०१४

**परिपत्रक :-**

शासन निर्णय दि.३१.१२.२०१४ अन्वये मंत्रालयातील अधिकारी/कर्मचारी यांच्या कार्यालयीन उपस्थितीची वेळ लवचिक करण्याबाबत निर्णय घेण्यात आलेला आहे. तसेच उक्त संदर्भाधीन दि.३०.०६.२००६ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये मंत्रालयातील सर्व अधिकारी व कर्मचारी यांनी त्यांची कार्यालयीन उपस्थिती बायोमॅट्रीक प्रणालीवर नोंदविण्याबाबत सूचना देण्यात आलेल्या आहेत. मंत्रालयीन आगीच्या दुर्घटनेनंतर मंत्रालयातील काही विभाग सार्वजनिक बांधकाम भवन, मर्झबान रोड येथे तसेच जी.टी. रुग्णालय येथील इमारतीमध्ये कार्यरत आहेत. सदरहू दोन्ही इमारती छत्रपती शिवाजी महाराज टर्मिनस येथून जवळच्या अंतरावर आहेत. त्यामुळे सीएसएमटी येथून मंत्रालयात येणारे अधिकारी व कर्मचारी यांना सदरहू इमारतीमधील मशीनवर बायोमॅट्रीक उपस्थिती नोंदविणे, ती जवळच्या अंतरावरच असल्याने सोयीचे जाते. मंत्रालयातील बऱ्याच विभागातील अधिकारी व कर्मचारी बायोमॅट्रीकव्दारे उपस्थिती नोंदविण्याकरीता उक्त दोन इमारतीमधील तळमजल्यावर असलेल्या मशीनवर पंचिग करण्यासाठी मोठया प्रमाणावर गर्दी करत असल्याचे निदर्शनास आले आहे. यासंदर्भात ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन यांचेकडून प्राप्त तक्रारीनुसार त्यांच्या विभागात ठेवलेल्या पंचिग मशीनवर उपस्थिती नोंदविण्यावरुन ग्रामविकास विभागातील कर्मचारी व अन्य मंत्रालयीन कर्मचारी यांच्यामध्ये खटके उडत असून, त्याचा गंभीर परिणाम बांधकाम विभागातील कार्यालयीन वातावरणावर होत आहे. सदरची बाब कार्यालयीन शिस्तीस धरुन नाही.

२. मंत्रालयातील प्रत्येक अधिकारी व कर्मचारी यांनी त्यांची बायोमॅट्रीक प्रणालीव्दारे नोंदवावयाची उपस्थिती ही, ते जेथे कार्यरत आहेत त्या इमारतीमधील मशिनवरच नोंदविणे आवश्यक आहे. कार्यालयात उपस्थित असल्याची नोंद घेणे हा कार्यालयीन शिस्तीचा एक महत्वाचा भाग आहे. कोणत्याही अधिकारी/कर्मचाऱ्याची उपस्थिती नोंदविलेली असणे याचा अर्थ संबधित अधिकारी/कर्मचारी त्याला नेमून दिलेल्या कार्यालयात कामकाज करण्यासाठी तातडीने उपलब्ध आहे असा होतो. कार्यालयापासून दूरच्या अंतरावरील बायोमॅट्रीक मशीनवर उपस्थिती नोंदविणे ही बाब सदरहू मान्यतेला छेद देणारी आहे.

३. वरील सर्व बाबींचा विचार करुन या परिपत्रकाव्दारे सूचना देण्यात येत आहे की, मंत्रालयातील प्रत्येक अधिकारी व कर्मचारी यांनी त्यांची कार्यालयात उपस्थित होतांना

मशीनवर करावयाची उपस्थिती ही, त्यांची पदस्थापना ज्या इमारतीमध्ये आहे, त्या इमारतीमध्ये व इमारतीच्या आवारात लावलेल्या मशीनवरच नोंदविणे बंधनकारक आहे. (जसे मंत्रालय मुख्य इमारत, ॲनेक्स इमारत व नवीन प्रशासन भवन या इमारतींमधील कार्यरत अधिकारी/ कर्मचाऱ्यांनी त्या इमारतीच्या आवारातील मशिन्सवर पंचिग करणे आवश्यक आहे.) त्यानुसार, प्रत्येक अधिकारी व कर्मचारी त्यांची कार्यालयीन उपस्थिती नोंदवित आहे किंवा कसे याची पडताळणी करण्याची जबाबदारी त्या त्या मंत्रालयीन विभागाच्या आस्थापना शाखेची राहील. जे कर्मचारी अशा पध्दतीने त्यांची उपस्थिती नोंदवित नसतील कर्मचाऱ्यांची त्या दिवसाची उपस्थिती ग्राहय धरण्यात येवू नये .

मंत्रालयीन प्रशासकीय विभागातील प्रत्येक अधिकारी व कर्मचारी यांनी उक्त सूचनेचे काटेकोरपणे पालन करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९११०७११५९३१४४०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anshu Sinha

Digitally signed by Anshu Sinha
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a3a7504068b24f4e7eb0277456c1fe4e5d31e4d0b0fdc81eb8816e33c5735b5b, serialNumber=e71208cc885f6d3c01b374ed0921df256abda4ed94d69472deb566c39b4ee68c, cn=Anshu Sinha
Date: 2019.11.07 12:03:21 +05'30'

**( अन्शु सिन्हा )**
**सचिव (प्र. सु. र. व का.)**

**प्रति,**

१. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधान सभा,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२. सर्व सन्माननीय संसद सदस्य, विधानसभा व विधानपरिषद सदस्य,
३. राज्यपालांचे सचिव,
४. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
६. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
९. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश,सी. डी.ओ. बॅरेक नं.१, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ०३२,
१०.इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई- ४०० ०२५,
११.राष्ट्रवादी कॉंग्रस पार्टी, राष्ट्रपती भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पाईंट, मुंबई-४०० ०२१

१२.शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई -४०० ०२८,

१३.बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई- ४०० ००१,

१४.भारतीय कम्युनिस्ट, महाराष्ट्र कमिटी,३१४, राजभवन, एस. व्ही. पटेल रोड, मुंबई,

१५.भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पार्टी, महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी मुंबई,

१६. निवड नस्ती (कार्यासन १८), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.